# कला आणि नीति

लेखक,
भास्कर रामचंद्र तांबे

प्रकाशक,
सखाराम बाळकृष्ण नाशिककर

सप्टेंबर १९३२

किंमत ८ आणे

ती॰ गुरुवर्य काशिनाथ कृष्ण लेले
यांचे चरणीं समर्पित.

# प्रस्तावना

प्रस्तुत लेख गेल्या डिसेंबर १९३१ मध्यें उज्जैन येथें भरलेल्या मध्यभारतीय द्वितीय कविसंमेलनासाठीं लिहिला. तोच आतां पुस्तक-रूपानें प्रसिद्ध करीत आहें.

कलेसंबंधीं लिहिलेला कोणताही सामान्य लेख आदर्शभूत कलेला अनुलक्षूनच लिहिलेला असावयाचा. तसाच हा आहे. मोराचें वर्णन मोराचा पिसारा पांघरून ठुमकत चालणाऱ्या डोमकावळ्याला कसें लागू पडेल? त्याचप्रमाणें गल्लोगल्लीं हिंडे ओढून तानसेन होऊं पाहणाऱ्या तोतयाला किंवा ट ला ट मिळवून कालिदास होऊं इच्छिणाऱ्या ढोंग्याला खऱ्या कलाकाराचें वर्णन कसें लागू पडेल? या दृष्टीनें कलेसंबंधीं उत्तम, मध्यम आणि अवर असें जें तारतम्य प्राच्य साहित्यकारांनीं केलें आहे तें यथार्थच आहे. प्रस्तुत लेख हीन कलेसंबंधीं लिहिलेला नाहीं ही गोष्ट ध्यानीं ठेविली म्हणजे गैरसमज होणार नाहीं.

लष्कर, ग्वालेर
७ आगष्ट १९३२.

भास्कर रामचंद्र तांबे

# कला आणि नीति

अपि चेत् सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।
साधुरेव स मन्तव्यः सम्यक् व्यवसितोहि सः ॥

—भगवद्गीता.

ललितकला आणि नीति यांचा परस्पर संबंध काय? ती नीतीला नमून असते कीं नीतीविषयीं उदासीन असते हा वाद जुनाच आहे. फार प्राचीन काळापासून याविषयीं उभय पक्षांमध्यें मोठमोठीं रणें माजलीं आहेत. गेल्या शतकांत यासंबंधानें युरोपमध्यें फार कडाक्याचा वाद झाला. परंतु अद्यापि दोन्ही दळांतील वीर जसेच्या तसे आपआपली मोर्चाची जागा सांभाळून संधीची वाट पाहत आहेत. आपल्या इकडेही हा वाद नवीन नाहीं. अलीकडे तर अश्लीलता, ओलेती अशीं प्रकरणें उपस्थित होऊन यासंबंधीं खूप झटापटी व नवीन संग्राम सुरू झाला आहे. आणि देशांतील विचारी पुरुषांचें लक्ष या वादग्रस्त मुद्याकडे लागलें आहे. मोर्लेसाहेबानें याची "An old Enemy with a new face" अशी बोळवण केली आहे. असो; अद्यापि आपल्या इकडे तरी तात्विक निरूपण करून वादाची दिशा सत्यान्वेषणाकडे वळविल्याचें फारसें दिसून

येत नाहीं. जी काय चर्चा झाली आहे ती बहुतांशीं व्यावहारिक स्वरूपाचीच आहे. अशा वेळीं तात्विकदृष्ट्या कला आणि नीति यांचा परस्परसंबंध काय याबद्दल विचार केल्यास अस्थानीं होणार नाहीं.

मला वाटतें कला आणि नीति यांचा स्वभावतः काडीइतका संबंध नाहीं. उलट, कला आपल्या लीलाविलासांत चूर असतां नीति अनीतीच्या भानगडींत पडावयास तिला सवडच नसते असेंच दिसून येतें. नीतीचा बागुलबोवा पुढें ठेवून कलेनें आजपर्यंत कधीं पाऊल टाकलें नाहीं आणि पुढें तरी कधीं ती नीतीची बूज राखील कीं नाहीं याची वानवाच आहे. असें असूनही कला अत्युच्च व संपूर्ण नीतीचें माहेरघर होय, व नीतिशास्त्रवेत्ते किंवा वृद्ध आचार्य, ग्रंथावर ग्रंथ लिहून आणि व्याख्यानांवर व्याख्यानें झोडून अथवा विधिनिषेधाचे शेंकडों पाठ घालून जें नीतीचें कार्य करूं शकत नाहींत तें कला एक दोन फटकाऱ्यांसरशीं घडवून आणते, एवढेंच नव्हे तर व्याख्यानांची वाफ थोड्याच अवकाशांत वातावरणांत जिरून जाते तर कलेचे परिणाम चिरस्थायी असतात, अशी ती परम मांगल्याची खाण होय, संपूर्ण सद्गुणांचें परमधाम होय. हें विचित्र कोडें वाचून कित्येकांस आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं, आणि हें कोडें उकलण्याचा हा अल्प प्रयत्न आहे.

२ कलेचा आणि नीतीचा संबंध काय असावा याचा विचार करण्यापूर्वीं तो कशा प्रकारचा आहे हें पाहणें अधिक बोधप्रद होईल. या दृष्टीनें विचार करून पाहतां अगदीं सरळ उत्तर संगीत,

नृत्य, शिल्प यांजकडून मिळतें. तोम् तन्नन् करणारा गायक कोणते नीतीचे पाठ घालतो? बीन वाजवून आजपर्यंत कोणा पुरुषाला त्या कलाकारानें अन्नसंतर्पण करावयास लाविलें? नृत्यकार कत्थकानें नैवेद्यवैश्वदेवाचें महत्त्व कोणा गृहस्थास समजावून सांगितलें? मूर्तिकारानें कोणा व्यभिचारी पुरुषाचें अंत:करण एकपत्नीव्रताकडे वळविलें? ताजमहालानें कोण्या मद्यप्याची मद्यलालसा सोडविली आणि त्याचें मन 'स्नानसंध्या टिळे माळा'कडे वळविलें? 'मातृदेवोभव,' 'पितृदेवो भव,' 'आचार्यदेवोभव', 'स्वाध्यायान्माप्रमदितव्यम्' इ. विधिनिषेधाचे पाठ घालण्याच्या भानगडींत या कला कधीं पडल्या काय? याचें उत्तर आबालवृद्धांच्या तोंडांतून विचार करण्याची गरज न वाटतां एकदम "छे! नीतीचा या कलांशीं कोठेंच संबंध येत नाहीं!" असें निघाल्यावांचून राहणार नाहीं. तेव्हां निदान या कलांविषयीं तरी हा वाद उपस्थित होत नाहीं. राहिल्या दोन कला, काव्य आणि चित्र. यांचें वाहन शब्द व रंग असें स्थूल असल्यामुळें नीतिवाद्यांना या बाजूनें कलेवर भडिमार करणें सोपें पडतें. या दोघींना जेरीस आणण्याचा आटोकाट यत्न चालला आहे. आणि आम्हां शहाण्या माणसांची पिरपिर आणि ससेमिरा सारखा यांच्या मागें लागला आहे. पण या आरडाओरडीची या कलांनीं तरी कोठपर्यंत फिकीर केली आहे याचा आपण विचार करूं.

या कलादेखील हें दृश्य विश्व अंतर्बाह्य जसें आहे तसें रंगविण्यांत गुंतल्या असतां विश्वांतील नीति व अनीति या दोहोंचें प्रति-

बिंब त्यांच्या कृतींत पडतें; स्वतः त्या दोहींविषयीं उदासीनच असतात असें दिसून येतें. अनीतीला वगळून किंवा अव्हेरून फक्त नीतीचेंच देव्हारें त्यांनीं केलें असतें तर त्यांची प्रतिसृष्टि अपुरी राहून त्यांची साक्ष खोटी ठरली असती. पण नीति त्यांचा विषयच नव्हे. संगीतादि कलांहून त्यांचें वाहन भिन्न असलें तरी सर्व कलांचीं मूलतत्त्वें आणि स्वभाव सारखेच आहेत. नीतीविषयीं त्या कलांची जी साक्ष आपण घेतली तीच ग्राही कलांची पडेल. या कलांनीं नीतीचें ध्येय सोडतां कामा नये असा वितंडवाद घालत बसण्यापेक्षां त्यांचीच प्रत्यक्ष साक्ष घेणें बरें. या दृष्टीनें साऱ्या वाङ्मयाचा आढावा काढणें म्हणजे समुद्रमंथन करण्यासारखें दुर्घट होय. त्याला देवदानवच पाहिजेत! म्हणून 'शितावरून भाताची परीक्षा' या न्यायानेंच याचा विचार करणें शक्य आहे. सांप्रतकालीं पश्चिम सूर्याला वंदन करण्याची वहिवाटच पडून गेली आहे त्याच प्रथेला अनुसरून आपण अग्रमान इंग्रजी काव्याला देऊं. चॉसर, स्पेन्सर इ० प्राचीन कवि एकीकडे ठेवून पाश्चात्यांचा 'कविकुलगुरु' शेक्सपियर, ज्याला मेकॉलेनें 'Prince of all Poets' म्हटलें आहे त्याची तपासणी आधीं करूं. त्याचें कोणतेंही नाटक हातीं घ्या आणि मग पाहा कीं, आपल्या उत्तान भराऱ्या आणि उड्डाणांत त्यानें नीतीचें जड बोचकें आपल्या पंखांवर वाहून नेलें होतें कीं काय? यागोसारखा चांडाळ, गानरिल रेगनसारख्या राक्षसिणी, लेडी मॅक्बेथसारख्या पापिणी, शायलॉकसारखे नरमांसासाठीं टपलेले खुनी—यांसारखे अनेक स्त्रीपुरुष आणि बहुधा यांचाच अंतीं जयजयकार. हें सारें नीतिप्रवर्तक होय

असें म्हणणारास वेड लागलें आहे असेंच म्हणावें लागेल ! अचकट-विचकट शृंगार, पाशवी भोगतृष्णा आणि लंपटता, अभद्र भाषणें इ० आणि नीतिपाठ यांमध्यें पुरा छत्तिसाचा आंकडा आहे हें कोणालाही कबूल करावें लागेल. सोंवळ्यांत सोंवळा मिल्टन; स्वतः प्युरिटन भटजी; पण त्यानें देखील भेसूर नर्क उपसण्यास कमी केलें नाहीं ! त्याचीच Beauty is nature's coin, must not be hoarded but must be current" इ० पुष्पांजली पाहा ! पुढें कलांना उतरती कळा लागली होती. म्हणून एक दोन पिढ्या सोडून दिल्यास चालेल. १९ व्या शतकाच्या आरंभीं मोडकळीस आलेल्या काव्यमंदिराचा जीर्णोद्धार झाला. त्याचे मोठे कारागीर वर्डस्वर्थ बायरन् ,शेले, कीट्स,इ० यांपैकीं बायरन्चा मासला पाहूं.' कॉर्सेअर' मधले चोर, चांचेवाले, लुटारू, धाडेती; लॉरा, डॉनजुआन मधील नायक नायिका; ब्राइड ऑफ अबिडास मधील मात्रागमनी धटिंगण येथून तेथपर्यंत ' बुभुक्षितः किं न करोति पापम् ' हें ढळढळीत अक्षरांनीं कोरिलेलें ! किंग्स्लेचा एक मासला येथें देतों. एका भल्या मोठ्या सरदाराच्या तारुण्यानें मुसमुसलेल्या एका मुलीच्या शृंगारचेष्टांना कोठें वाव मिळेना; रतिमदांत सैरावैरा भ्रमण करणारी ही प्रमदा दारापाशीं असलेल्या लोखंडी गजाच्या पाहरेवाल्यांच्या बैठकींतील जमादारापाशीं आली आणि गजाशीं आपलें तोंड भिडवून एका बोटानें डोळा फाडून त्या गललठ्ठ पाहरेकऱ्यास म्हणते " ए जमादार, जरा माझ्या डोळ्यांत काय गेलें आहे तें बघ तर. " हे भोळेभाबडे शिपाई गडी ! उठल व बोटानें फाडलेल्या

डोळ्याकडे निरखून पाहून म्हणाले " हत तर काइं बि नाइं बाइ-साब ! " तेव्हां हिरमोड होऊन ही तरुणी बोटें मोडून कपाळास आंठ्या पाडून म्हणते " जळ्ळ तोंड मेल्याचे ! धटिंगणा बेलोबा, तरुण स्त्रिया आपले डोळे पुरुषाला कां दाखवितात हें समजण्याची देखील अक्कल तुला नाहीं ! ! " वाह वा रे नीति ! त्यांत तुर्रा हा कीं, एका दुसऱ्या कलाकारानें याचें वर्णचित्र काढून त्याला " A mote in the eye " "डोळ्यामधें कण" असें नांव दिलें आहे. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तर शतार्धाकडे आतां दृष्टि टाकूं. या काळीं टेनिसन्‌चा बोलबाला जिकडे तिकडे चालला होता. त्याचा अर्थूरियन राउंड टेबलमधील सर्वांत मोठा आणि पराक्रमी सरदार लॅन्सेलॉट यावर इलेन दि लिली मेड ऑफ ॲस्टोलॅट या सुंदर, पवित्र तरुण कुमारीचें मन बसलें. पण तिच्या अकृत्रिम, निष्क-लंक, अव्याज प्रेमाचें यानें काय चीज केलें पाहा; तिला झिडका-रिलें व तिच्या अंतास कारण होऊन या बहाद्दरानें आपली प्रत्यक्ष स्वामीण राणी गिनिव्हिअर इच्याशीं संधान लाविलें ! याचें नांव नीति !

आतां आपण प्राच्य काव्याकडे दृष्टि वळवूं. या काव्याचें क्षेत्र सुद्धां इतकें अफाट आहे कीं, त्याचा आढावा काढणें देखील अशक्य आहे. केवळ दोनच जगद्विख्यात नाटककारांचें मासले आपण पाहूं. एक ' कविकुलगुरु ' कालिदास आणि दुसरा शूद्रक. शाकुंतलांतील नायक राजा दुष्यंत हा परमपूज्य कुलपति कण्वऋषि याच्या पुण्या श्रमांत त्याच्या गैरहजिरींत चोरासारखा शिरतो. ( शकुंतलेला त्याज-

कडे पोंचती करावयास गेलेल्या ऋषिकुमारानें त्यास चोरच म्हटलें आहे. ‘ मुष्टं प्रतिग्राहयिता स्वमर्थं पात्रीकृतो दस्युरिवासि येन. ’) येणेंप्रमाणें शिरून कुलपतीचें केवळ ‘ उछ्वसितच ’ अशी सुंदर शकुंतला हिला फुस लावतो आणि इतका लंपट होतो कीं, ती गुरुजनांच्या संमतीविषयीं आग्रह करीत असतां गांधर्वविवाहाच्या थापा व दाखले देऊन तिच्याशीं चोरटा विवाह करितो ! केवढी नीतिमत्ता ही ! ! सांप्रतच्या कायद्याप्रमाणें पिनलकोडचें पुरें ४९५ कलम ! बरें, पुढें तरी त्यानें सचोटीनें वागावयाचें होतें. पण येणेंप्रमाणें त्या बिचारीला फसवून तेथेंच टाकून हे राजेश्री आपल्या राजधानींत जाऊन आपल्या राण्यांमध्यें दंग होतात व तिला साफ विसरतात ! पुढें कण्व ऋषि घरीं आल्यावर त्यांस हा सारा प्रकार समजल्यावर चोराला चोरीचें धन पोंचतें करावें अशा शुद्ध भावनेनें या फसव्या राजाकडे आपली लाडकी कन्या पाठवितो तेव्हां हे नीतीचे समुद्र मनांतून

इदमुपनतमेतद्रूपमक्लिष्टकान्ति
प्रथमपरिगृहीतं स्यान्नवेति व्यवस्यन्।
भ्रमर इव विभाते कुन्दमन्तस्तुषारम्
न च खलु परिभोक्तुं नैव शक्नोति हातुम् ॥

असे तिच्या रूपयौवनाला पाघळत असतां वरून ‘ न दर्शनीयं परकलत्रम् ’ असा नीतीचा कांगाव करून तिचा संबंध तोडतात ! याचें नांव नीति ! पण कोणी म्हणेल राजा काय करील ? दुर्वासानें शकुंतलेला

विचिन्तयन्तीयमनन्यमानसा
तपोधनं वेत्सि नमामुपस्थितम्।
स्मरिष्यति त्वां न स बोधितोऽपि सन्
कथांप्रमत्तः प्रथमं कृतामिव ॥'

असा शाप दिला होता. त्यामुळें राजा ही गोष्ट विसरला. पण मूळ प्रश्न तर हाच आहे कीं, कालिदासाला नीतीची बूज राखावयाची असती तर मूळ महाभारतांतील गोष्टींत दुर्वासशापाचें कुलंगडें नसतां, त्यानें असा अनीतिकारक प्रसंगच कां निर्माण केला असता?

आतां मृच्छकटिकाकडे पाहा:—चारुदत्तासारखा कर्मनिष्ठ, उदार, नगराला भूषणभूत असा सत्पुरुष; आणि तो वसंतसेनेसारख्या वेश्येशीं रममाण होतो आणि तिच्या अंगस्पर्शानें आपलें पवित्र, शुद्ध अंग विटाळलें असें न मानतां त्यांत धन्यता मानतो व निलाजरेपणानें म्हणतो—

"धन्यानि तेषां खलु जीवितानि
ये कामिनीनां गृहमागतानाम्।
आर्द्राणि मेघोदकशीतलानि
गात्राणि गात्रेषु परिष्वजन्ति ॥"

शर्वीलक जातीचा ब्राह्मण; त्याचें मन गुलाम बटीक मदनिका इच्यावर बसतें आणि तिला दास्यांतून सोडवून आपली करावयास निष्कया-पुरता पैसा आपल्यापाशीं नसल्यामुळें चारुदत्ताचें घर फोडून चोरी करितो आणि प्रसंग पडता तर खून देखील करता. नंतर तें चोरीचें धन वसंतसेनेला देऊन मदनिकेसारख्या नाटकशाळेला खुशाल

घरांत घालून तिच्याशीं मनसोक्त क्रीडा करितो ! बरें, वेश्यासंबंध त्याकाळीं निंद्य मानीत नसतील असें म्हणावें तर तेंही खरें नाहीं. कारण, मैत्रेय चारुदत्ताचें मन वेश्यासंबंधापासून फिरवावें यासाठीं म्हणतो—

“ तदहं ब्राह्मणो भूत्वा भवन्तं शीर्षेण पतित्वा विज्ञापयामि । निवर्त्यतामात्मा अस्माद्बहुप्रत्यवायात् गणिकाप्रसंगात् । गणिका नाम पादुकान्तरप्रविष्टा इव लेष्टुका, दुःखेन पुनर्निराक्रियते । ”

स्वतः शर्विलकानें

“ एता हसन्ति च रुदन्ति च वित्तहेतोः
विश्वासयन्ति पुरुषं न तु विश्वसन्ति ।
तस्मान्नरेण कुलशीलसमन्वितेन
वेश्याः श्मशानघटिका इव वर्जनीयाः ॥

अशी वेश्यासंबंधाची हवी तशी निर्भर्त्सना केली आहे ! असें असूनही शूद्रकाला हीं अनीतीचीं कर्में रंगवितांना लाज वाटली नाहीं !

येथें कोणी असें म्हणतील कीं, अनीतीचा दुष्परिणाम दाखवून ‘ रामादिवत् प्रवर्तितव्यम् न तु रावणादिवत् । ’ असा अप्रत्यक्षपणें नीतीचा ठसा जनतेवर उमटविण्याचा कलाकाराचा हेतु असतो, तर तेंही खरें नाहीं. शेक्सपियरनें गॉनरिल, रेगनसारख्या नीतिभ्रष्ट पापिणीला आमरण राज्यविलासांत आणि लक्ष्मींत लोळूं दिलें आहे आणि त्यांचीच बहीण कार्डेलिया हिज सारख्या सत्यप्रिय, मंगलमय, प्रीतिपूर्ण कन्येला भयंकर भुयारांत कोंडून तिच्या दीन अंध बापाच्या मांडीवर या राक्षसिणीला तिचा अत्यंत छळ छळ करून वध करूं दिला आहे !

यागोसारखा चांडाळ आपल्या कृष्णकारस्थानांत यश आलेलें पाहून कृतकृत्य होऊन मिशावर ताव देत निगर्गेट्ट होऊन बसतो तर डेस्डिमोनासारखी नीतिशुद्ध, पवित्र, प्रीतीची खाण अगदीं निष्पाप असतां, ज्याला तिनें अनंत विघ्नांस न जुमानून आपलें सर्वस्व अर्पण केलें त्याच तिच्या पतीच्या हातीं हा मंगलमय दिवा मालविला जातो ! शूद्रक चोर, जार अशा शर्वीलकाच्या हातीं राज्यक्रांतीसारखें महत्कार्य घडवून आणितो आणि त्याला मुख्य सेनापतीच्या पदावर चढवितो ! काय म्हणावें याला ? हीं काय अनीतीचीं कडू फळें ? बरें, या जगांत तरी आपण काय पाहातों ? दुष्ट दुराचाऱ्यांच्या घरीं बहुधा गजांत लक्ष्मी, आणि फुंकून पाय ठेवणाऱ्याच्या ' घरांत वाजे नकारघंटा; ' असेंच कीं नाहीं ? मग कलाकारांनीं हा उफराटा संसार जसा आहे तसा वर्णिला तर त्यांना तरी नांवें काय म्हणून ठेवावीं ? कलेसंबंधीं आमची अपेक्षा जगाविषयीं यथातथ्य ज्ञान प्राप्त करून घेण्यापुरतीच नसून त्याहून अगदीं भिन्न व विशिष्ट प्रकारची आहे. पण निदान जगाचें खरें स्वरूप आम्हास कळावें एवढीही आशा आम्ही धरूं नये काय ? तेव्हां कला नीतीविषयीं बेपर्वा असते हें योग्यच आ।

३ येथपर्यंत नीतीविषयीं आजतागाईत कलेचें धोरण कशाप्रकारचें आहे तें आपण पाहिलें. आतां कला, नीति, व अनीतीसंबंधीं उदासीन असतां संपूर्ण व सर्वोच्च नीतीचें मंगलधाम होय हें कसें, या प्रश्नाचा विचार करूं; पण हा प्रश्न गहन आणि तात्विक स्वरूपाच। आहे. यासाठीं एकाएकीं त्यांत हात घालण्यापूर्वीं कलेचा स्वभाव

काय, तिचा उद्भव कसा होतो या मुद्यांचा प्रस्तुत विषयापुरता आपण आधीं विचार करूं; म्हणजे कदाचित् या विवेचनांतच आपल्या प्रश्नाचें उत्तर आपणास मिळून विशेष खोल पाण्यांत शिरण्याची फारशी गरज राहणार नाहीं.

कलेच्या स्वभावाचा विचार करितांना फक्त ज्यांचा आपल्या विषयाशीं संबंध येतो तेवढेच स्वभावविशेष येथें ध्यानीं घ्यावयाचे आहेत. सारींच लक्षणें येथें सांगितल्यास उगीच विस्तार होईल. पहिली गोष्ट कलेच्या स्वातंत्र्यप्रियतेविषयीं. तिचें खरें स्वरूप तिच्या स्वातंत्र्यांत, स्वैरविहारांत प्रकट होत असतें. तिला कसलेंही बंधन किंवा दडपण खपत नाहीं. फार काय सांगावें? ब्रह्मदेवाची बंधनें देखील ती झुगारून देते. म्हणूनच मम्मटानें काव्यकलेविषयीं लिहितांना तीं ‘ नियतिकृतनियमरहित ’ ‘ अनन्यपरतंत्र ’ असते असें म्हटलें आहे! गटेच्या “ Art is Art precisely because it is not Nature ” म्हणजे ‘ कलेला कला म्हणावयाचें तें केवळ एवढ्यासाठींच कीं ती निसर्ग नव्हे ’ या उक्तींतील रहस्य देखील हेंच आहे. अर्थात् सृष्टीचे नियम कलेला बांधूं शकत नाहींत हा त्याचा एक भावार्थ आहे. फार काय, कला भरांत आली म्हणजे स्वतःचीं बंधनें देखील विसरते. निष्णात गायनपटु कलाकार एखाद्या रागांत रंगला म्हणजे पदोपदीं त्यांत लागणाऱ्या सुरांना स्मरून स्मरून गात नसतो. त्या रागाचे सूर आपल्या आपण धांवत असतात. कवितेचें देखील असेंच. ती भरांत आली म्हणजे ‘ वाचमर्थोऽनुधावति ’ असेंच होतें. येणेंप्रमाणें स्वातंत्र्य हें कलेचें जीवन

होय. तेव्हां सत्य, नीति किंवा सौंदर्य यांची भरभक्कम बोचकीं, तिच्या कल्पना भावनादि पंखांवर लादलीं तर तिची धडगत राहणार नाहीं. तिचे पंख तुटून पडतील. स्वर्ग, मृत्यू, पाताळांत यथासुख भराऱ्या मारून या दृश्य पसाऱ्याच्या आंत हात घालून त्याच्या रहस्याचा ठाव घेण्याची तिची ताकत नाहींशी होईल. संगीतकलेला धर्माचें अवजड गाठोडें घेऊन चालण्यास आपण फर्मान काढिल्यास आपणास काय मिळेल? केवळ भजनें! तिचीं अर्थशून्य ससकें, तराणे, ध्रुपदें, ख्याल, टप्पे यांत तिचा जो अप्रतिहत संचार प्रगटतो आणि जो आनंदाचा अलोट प्रवाह वाहत असतो त्याचें काय होईल? तिचीं वेलबुट्टीचीं कामें भजनांत कोठून मिळतील? तिचें चंचल नृत्य, अपार शृंगार सारें नाहींसें करून, तिचा वीणा हिस्कून घेऊन, तिच्या हातीं एकतारी आणि चिपळ्या देऊन तिला जोगीण बनवावें, अशी कठोर वृत्ति तिच्या हितशत्रूंना देखील धारण करिताना भडभडेल! संगीताचें खरें स्वरूप ज्याला हवें असेल त्यास ही निर्दयतेची कल्पना शिवणार देखील नाहीं. हीच गोष्ट काव्यकलेची. 'धरी रे ध्यानीं-जग अळवावरचें पाणी,' किंवा 'एक तुतारी द्या मज आणुनि--फुंकिन ती मी स्वप्राणांनीं' किंवा 'झपूर्झा गडे झपूर्झा,' अशीं धर्माचीं, सामाजिक नीतीचीं किंवा तत्त्वज्ञानाचीं बंधनें तिला जखडूं लागलीं तर तिचा स्वैरविहार कसा राहील? तिनें धर्माला नमावें, समाजतत्त्वाला मान लववावी, नीतीपुढें नाकदुराई करावी अशी अपेक्षा करणाराला तिचा स्वच्छंदी स्वभाव कळलाच नाहीं असें म्हटलें पाहिजे. 'रुणत्कार जीच्या करीं कंकणाचा--झण-

त्कार जीच्या पदीं नूपुरांचा ' अशी परमरमणीय चिरतरुणी सरस्वती कीं जीस पाहून वेदाभ्यासजड वृद्ध विधात्यानें देखील चारी मस्तकें एकदम डोलवावीं; तिचा सारा शृंगारसाज हिरावून तिच्या बांगड्या वाढवून, काजळ कुंकू पुसून केशकलाप काढून तिला बांड नेसावयास देऊन गंगाभागीरथी करून ज्यास तिच्या हातांत स्मरणी द्यावयाची असेल, कपाळाला गोपीचंदनाचा टिळा फांसावयाचा असेल त्या कठोर, निर्दयी, सोंवळ्या भटुरग्यांना तिची कदर काय ? तिचा स्वभाव काय ठाऊक ? तिचा सहज विलास, तिची विलक्षण जादू, तिचें अपरंपार मांगल्य, तिचें सत्य, तिचें पावित्र्य, तिचें पुण्यस्वरूप ज्यांस हवें असेल त्यांनीं असला अव्यापारेषु व्यापार करूं नये हेंच त्यांच्या हिताचें आहे. ती विश्वांत स्वैरसंचार करीत असतां, अहमहमिकेनें शहाणपणाचा तोरा मिरविणारे जे आम्ही त्यांस जी नीति, जीं सत्यें कधींही दिसणें शक्य नाहीं, तीं ती पाहात असते. ' जें न देखे रवी तें देखे कवि ' अशी ती चोकस बुद्धीची आहे. पण तिच्या स्वातंत्र्यांत आपण आडकाठी घालतां कामा नये, तरच तिजपासून या साऱ्या गोष्टी लाभण्यासारख्या आहेत. हा तिचा स्वैर स्वभाव ज्यांस ठाऊक असेल ते तिच्या मागें नीतीचा धोंशा लावणार नाहींत.

येथें ध्यानीं घेण्यासारखा कलेचा दुसरा स्वभावविशेष तिची निष्कामता. माणसाला चालावयाचें नसतें तेव्हां तो नाचतो; बोलावयाचें नसतें तेव्हां तो गातो; जमाखर्चाचे खर्डे घांसावयाचे नसतात तेव्हां कवन करितो. तात्पर्य,सांसारिक काळज्या, गरजा नाहींशा झाल्या म्हणजे तो कलेकडे वळतो. त्यावेळीं तो सांसारिक दृष्टीनें

अगदीं निरुपयोगी झालेला असतो. त्याची बहिमुर्खता लोपून, तर्क वितर्क नाहींसे झाले म्हणजे तो अंतर्मुख होतो व स्वतःशीं लीन होतो. तेव्हां स्वार्थाचा पूर्ण लोप झालेला असतो. विश्वाकडे पाहण्याची त्याची दृष्टि बदलते. त्यावेळीं जगांतील वस्तूपासून संसारोपयोगी मीठभाकरीची तो अपेक्षा करीत नसतो. त्यांतील आनंद तो लुटत असतो. फुलाकडे पाहून आम्ही त्याच्या सांसारिक उपयोगाची अपेक्षा करीत असतों. आमची दृष्टि सकाम असते.

परी फुला तूं पुसशी भलतें—
'औषध, मद्य काय देशिल तें ?
चिरतां, चुरतां तुज का मिळतें ?-
छे ? चल मग निघ तव डौल पुरे !'

ही आमची फुलाविषयीं सकाम दृष्टि असते. पण एक फुलापासून चंद्रसूर्यनक्षत्रांपर्यंत आब्रह्मस्तंभ अंतरंगीं जें अमृत भरलें आहे

तेंच फुलाच्या मार्दवें फुललें—
सुवर्णवर्णी उषेंत खुललें,—
सायंतानें तरुगिरिवरि झुललें—

त्याशीं तो निष्कामपणें समरस होत असतो. हें सारें दृश्य विश्व त्याला अनंत सौंदर्याची—आनंदाची--प्रेमाची वार्ता सांगत असतें. या आनंदाच्या अपरंपार तटविहीन अमृतसागरांत सारें विश्व संक्रांत झालेलें--रंगलेलें--तो आपल्या मनश्चक्षूंनीं पाहत असतो आणि इतका लीन होत असतो कीं, त्यावेळीं जगच्चक्राची घरघर त्याच्या-

पुरती थांबल्यासारखी होते--त्याला एकप्रकारची तंद्री--समाधि लागत असते. त्यावेळीं साऱ्या सांसारिक काळज्या, विवंचना नष्ट होतात. तेथें सत्यासत्य, नीत्यनीतीच्या झगड्याला वाव कोठून मिळणार ? या स्थितींत कलेचें जनन होतें. व्यवहारासंबंधीं निरुपयोगी अशी ही अवस्था कलेची जननी होय. म्हणूनच तीपासून व्यवहारदृष्टीनें देखील अनंत लाभ होण्यासारखे असतात ! 'काव्यं यशसेऽर्थकृते व्यवहारविदे शिवेतरक्षयते ' इ. मम्मटाचें म्हणणें या दृष्टीनें अगदीं खरें आहे. पण कलेचा मात्र तसा कांहीं हेतु नसतो. तें तिचें फल होय. सांप्रतचा काळ उपयुक्ततावादाचा आहे म्हणून कलेचें अमुक ध्येय असावें तमुक ध्येय असावें असा वादाचा धुमाकूळ जिकडे तिकडे माजलेला आहे. पण कलेविषयीं अशी सकाम वासना धारण करणें चूक होय. ती स्वतः सत्य किंवा नीति यासंबंधीं शर्करावगुंठित क्विनीनची गोळी देत नसते, आणि रसिक देखील तशी अपेक्षा करीत नसतो. तो आनंदासाठीं तिचा आश्रय करीत असतो, रस लुटत असतो त्यावेळीं सत्यासत्य नीत्यनीतीचीं कोडीं तो तिच्या कृतीपासून सोडवूं लागला तर रसास्वाद नाहींसा होईल. ' वयं तत्वान्वेषान्मधुकर हताः ' असें होईल. रसास्वादानें आत्मा तृप्त झाल्यावर नंतर हवी तर या दृष्टीनें कलाकृतीची छाननी करीत बसावें. तसें केल्यास हवें तेवढें सत्य, हवी तितकी नीति तुम्हास मिळेल.

४ येथपर्यंत आपण कलेच्या स्वभावासंबंधीं अवश्य तेवढ्या गोष्टींचा विचार केला. आतां कलेच्या उद्भवासंबंधीं विचार करा.

वयाचा; पण त्यापूर्वी आपण नीतीच्या स्वरूपाविषयीं थोडा विचार करूं. या जगांत जिला आपण नीति म्हणतों ती खरोखरीच सत्य-स्वरूप अशी कांहीं वस्तु आहे काय ? नीति ही सापेक्ष वस्तु आहे. अनीतीच्या अभावीं तिचें ज्ञान होणें संभवनीय नाहीं. ती जर केवल आणि सत्यस्वरूप असेल तर दोन आणि दोन चार याप्रमाणें कोठेंही व केव्हांही ती एकसारखीच दिसली पाहिजे. पण आपण या जगांत काय पाहतों ? आज जी गोष्ट नीतीची आपण म्हणतों तीच उद्यां अनीतीची ठरते. एका देशांत जी नीतिमत्ता समजली जाते तीच दुसऱ्या देशीं अनीति मानण्यांत येते. मग खरी नीति कोणती म्हणायची ? या जगांतील नीति अशी बहुरूपिणी आहे. म्हणूनच नीतिशास्त्रांत तीविषयीं वादाचा एक धुमाकूळ माजलेला दिसतो. कोणी म्हणतो जें आचरण उपयुक्त तें नीतीचें, म्हणजे उपयुक्तता तीच नीति. कोणी म्हणतो हृदयांतील सद्सद्विवेकता जें सांगेल ती नीति. कोणी म्हणतो मनुष्य हा स्वार्थी प्राणी आहे; तेव्हां ज्यानें त्यानें उत्तम स्वार्थ साधावा हीच नीति; असे उपयुक्तावाद, आधिदैवतवाद, स्वार्थवाद अशा अनेक वादांचीं रणें या नीतिशास्त्राच्या क्षेत्रांत माजलेलीं दिसतात. मग कलेनें कोणाला मान तुकवावी ? कोणाचा पक्ष धरावा आणि कोणाचा सोडावा ? कलेच्या क्षेत्रांत हा वादाचा झगडा धुमाकूळ घालूं लागला तर त्याला कंटाळलेल्या माणसानें शांतीसाठीं कोणाला शरण जावें ? खरें पाहूं जातां केवल नीति या जगांत नाहींच असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं. नीतिखंड मात्र येथें दृष्टीस पडतात, म्हणूनच

सरड्यासारखे नीति आपले रंग पालटीत असते. अशा अशाश्वत परिवर्तनशील नीतीचा अवलंब कलेनें केला तर नीतीचें तत्कालीन स्वरूप नाहींसें होतांच कला देखील नष्ट होईल. या जगाचें स्वरूपच अपूर्णतेचें आहे. येथें सत्याबरोबर असत्य, नीती-बरोबर अनीति, सौन्दर्याबरोबर कुरूपता अशी सळमिसळ झालेली आहे. सारें दृश्य जगत् द्वंद्वमूल आहे. म्हणून नीति अनीतीच्या भानगडींत न पडतां आपल्या विलासांत स्वैरपणें आणि निष्काम-पणें गुंग असावें असा कलेचा स्वभाव आहे. जगांत तरी आपण काय पाहतों ? नीतीचा नेहमींच जयजयकार झालेला दिसतो काय ? मग नीतीचें ढोंग करण्यासाठीं संसाराचें असत्य चित्र कलेनें काढावें काय ? अशी अपेक्षा करणाऱ्यांस कलेचा खरा स्वभाव कळलाच नाहीं असें म्हणावें लागेल.

५ येथपर्यंत आपण कलेच्या स्वभावाचा आणि तदंगभूत एखाद्या आणखी मुद्याचा विचार केला. आतां आपण कलेच्या उद्भ-वाचा विचार करूं. लहान मुली भातुकलीचा खेळ मांडतात; बाहुला–बाहुलीसाठीं घरकुलें करितात; त्यांचीं लग्नें लावतात; मेज-वान्यांचा थाटमाट करितात; आणि "उघडा उघडा दरवाजा कोण आलें घ्यायला ॥ धृ० ||–भाउजी आले घ्यायला--त्यांनीं काय आणिलें ? त्यांनीं आणिला सांखळ्यांचा जोड सांखळ्याचा जोड घ्यायची नाहीं--भाउजी संगं जायची नाहीं ? उघडा......॥ धृ० ॥ सासुबाई आल्या घ्यायला--त्यांनीं काय आणिलें ? त्यांनीं आणिला पाटल्याचा जोड--पाटल्याचा जोड घ्यायची नाहीं- सासुबाई संगं

जायची नाहीं. २ उघडा ... ॥ धृ० ॥ नवरोजी आले घ्यायला---त्यांनीं काय आणिलें ? त्यांनीं आणिला चाबकाचा मार--चाबकाचा मार घ्यायची नाहीं--नवरोजी संगं येईन ग ! ” अशीं गाणीं म्हणतात, झिम्मे घालतात. त्यांत त्यांचा काय हेतु असतो ? नीतीचे पाठ शिकावे, शिकवावे, सत्याची गोडवीं गावीं; सौंदर्याचें तत्त्वज्ञान सांगावें म्हणून त्या भातुकली मांडतात काय ? खेळावें म्हणून त्या खेळतात, आपल्या भावना आणि विचार यांना तोंड फोडावें ( Self-expression ) यांत विलक्षण आनंद असतो त्यासाठीं त्या आपला खेळ मांडितात ती त्यांची केवळ लीला मात्र असते. फार तर काय ? आपणांस पुढें असाच संसार करावयाचा आहे ही देखील त्यांना कल्पना नसते. पण बारीक विचार करून पाहतां या टुट्टपुट्टच्या खेळांत त्यांच्या कांहीं मानसिक शक्ति विकास पावत असतात असें दिसून येईल. त्यांची कल्पना, त्यांच्या भावना, त्यांचा विवेक या शक्ति सहजासहजीं न कळत कार्य करीत असतात. वस्तु नीटनेटकी ठेवणें, शिपाई प्यादे, गाडी घोडे, बागबगीचे, तलाव, विहिरी यांची निर्मिती करण्यांत त्यांची कल्पना भरारी मारीत असते. माझ्या बाहुलीला अमुक असावें, तमुक असावें, मी तिचें असें थाटाचें लगीन करीन इ० शेंकडों गोष्टींत त्यांच्या भावना रंगतात. त्यांची निरीक्षणशक्ति प्रगट होते. या गोष्टी तर आपणास दिसतातच. पण विशेष लक्ष लावून पाहिलें तर आणखी कित्येक गोष्टी दिसतात. प्रत्यक्ष संसारांत जीं न्यूनें त्यांना दिसतात, जीं बंधनें त्यांना जखडतात, ज्या यातना त्यांना डवचतात, त्यांचा

विटाळ देखील त्यांच्या बाहुला बाहुलीस होऊं न देण्याची त्या खबरदारी घेत असतात. स्वतःचा परकर कितीहि जुना फाटका असो, बाहुलीचा शालू मात्र अस्सल बनारसी असावा अशी त्यांची हाव असते. त्यांना स्वतःला खावयाला अन्न कसेंहि शिळेंपाकें कोंड्यामांड्याचें मिळो, त्यांच्या बाहुलीच्या लुटूपुटीच्या जेवणांत आणि लग्नकार्यांत पक्वान्नांचाच थाटमाट असावयाचा! स्वतःच्या अंगावर फुटका मणी नसला तरी बाहुलाबाहुली मात्र हिऱ्या-मोत्यांनीं नटलेल्या असावयाच्या! येणेंप्रमाणें प्रत्यक्ष संसारांतील वैगुण्यें, न्यूनें, यातना, विवंचना, दुःखें इ. टाळून स्वर्गसुख भूतलावर आणा-वयाची त्यांची खटपट असते. तेथें नीति अनीतीचा मुळींच प्रश्न नसतो. एक गोष्ट आणखी ध्यानीं ठेविली पाहिजे ती गूढतेविषयीं. त्यांना त्यांचा सारा खेळ दैवी दिसत असतो. कांहीं तरी अंधुक अस्पष्ट रहस्याची भावना न कळत त्यांच्या खेळांत प्रगट होत असते. त्या आपल्या बाहुलीची आरती करितात आणि एका विशिष्ट भावनेनें त्या तिजकडे पाहत असतात. आणखी एक गोष्ट येथें ध्यानीं घेतली पाहिजे. त्या आपला लुटूपुटीचा संसार प्रत्यक्ष संसा-राला पाहूनच मांडित असतात हें खरें; पण त्यांचा खेळ प्रत्यक्ष संसारासारखा रुक्ष, नीरस नसतो. प्रत्यक्षाचें निरीक्षण करून त्यांच्या मनांत ज्या भावना, जे विचार, जे तरंग उद्भवतात त्यांसह त्यांची प्रतिसृष्टी वठत असते. त्यांच्या मनांत उतरलेला संसार त्यांच्या मनांतील भावना, विचार—तरंग यांच्या गेहऱ्या छटांसह आणि छाया प्रकाशासह प्रकट होत असतो. अर्थात् संसारांत ज्या

भावनादिकांचे रंग नाहीत, ते मुख्यत्वेंकरून त्यांच्या मांडणुकींत मिळून गेलेले असतात. येणेंप्रमाणें विशेषतः प्रत्यक्ष सृष्टींत जें नाहीं तें त्यांच्या प्रतिसृष्टींत असतें व ती अधिकतर मानसिक असते. ती संसारासारखी असून त्याहून भिन्न असते. त्या संसारांत गुंतलेल्या असून संसारावर भरारी मारीत असतात. त्यांची कृति प्रत्यक्षाची नक्कल नसते. पण हा त्यांचा सारा खेळ असतो, लीला असते. दुसरा कोणताही हेतु तेथें नसतो. त्यांचा खेळ केवळ पंचमहाभूतांच्या पार्थिव प्रत्यक्ष सृष्टीसारखा नसतो. प्रत्यक्षापेक्षां कांहीं विशेष त्यांत असतें, म्हणून त्यांच्या आईबापांना तो अपूर्व वाटतो त्यांना मौज वाटते व आईबापें त्यांचें कौतुक करितात आणि त्यांना हवी असते ती सामुग्री आपल्या मगदूराप्रमाणें त्यांस पुरवितात.

अगदीं अशीची अशी गोष्ट कलेच्या उद्भवाची आहे. तुकारामानें कलेला भातुकलीच म्हटलें आहे. " माझ्या बापें मज दिधलें **भातुकें** । म्हणोनी कौतुकें **क्रीडा करीं** ॥ "तीदेखील कलाकाराची केवळ लीला होय; आत्मोद्गार ( Self expression ) होय. तुकाराम ' क्रीडा करीं ' म्हणतात. नीती अनीतीचे, सौंदर्यमीमांसेचे किंवा तत्त्वज्ञानाचे पाठ घालीं असें म्हणत नाहीत. लीलेशिवाय दुसरा कोणताही हेतु तेथें नाहीं. कोणतीही सामाजिक, धार्मिक, नीतीविषयक कोडीं कलाकाराला सोडवावयाचीं नसतात. विश्वाला पाहून त्यांत जीं न्यूनें कलाकाराला दिसतात, ज्या यातना, विवंचना, संकटें, दुःखें त्याला डवचतात त्या सर्वांना टाळून केवळ स्वर्ग भूतलावर आणण्याकडे, पूर्णता

प्रगट करण्याकडे त्याची साहजिक प्रवृति असते. या जगांत सत्यासत्य, नीत्यनीति, सौंदर्यासौंदर्य इ. द्वंद्वाची सळमिसळ झालेली आहे. त्यामुळें जगांत अनेक न्यूनें कलाकाराला दिसून त्यांचे चटके कलाकाराला बसतात. ते वगळून पूर्णतेकडे तो धांव घेत असतो. मुलीप्रमाणें तो देखील संसाराला ' ल्हादेकमय ' करीत असतो. या ल्हादेकमयतेचा प्रत्यक्षाशीं विरोध पाहून एक प्रकारची गूढ भावना याच्या या सर्व लीलेंत वावरत असते. त्यानेंच निर्माण केलेला डमरू त्याच्या पूजेचा विषय होऊन बसतो. तो आपल्या वीणेला माळा घालितो. तिचा तननन ध्वनि एका अपूर्व शक्तीचा द्योतक त्याला वाटूं लागतो. सप्तस्वर शंकराच्या जटेच्या कडकडाटांतून उत्पन्न झाले असें त्याला वाटूं लागतें. ही जगद्रहस्याची भावना त्याच्या सर्व कृतींत यमुनेच्या काळसर पाण्यांत संगमस्थानीं दिसणाऱ्या गंगेच्या शुभ्र धारेप्रमाणें झांक मारीत असते. याचा अर्थ असा नव्हे कीं, उठल्या सुटल्या तो रवींद्रनाथाच्या गीतांजलींत दिसणाऱ्या गूढगुंजनांत गुंतलेला असतो. छे! तसल्या भानगडींत तो फारच क्वचित् पडतो. तो जगत् जसें आहे तसेंच सांगत असतो; परंतु अमूर्त कल्पनामय जगांतून प्रत्यक्ष जगांतील मूर्त वस्तु कशी प्रगटली आहे हें रहस्य त्याच्या प्रतिसृष्टींत न कळत ध्वनित होत असतें. प्रत्यक्ष वास्तव विश्वाला पाहूनच त्याची लीला उत्पन्न होते हें खरें; पण ती वास्तवाप्रमाणें पार्थिव नसते. वास्तवाच्या सूक्ष्म निष्काम सप्रेम निरीक्षणानें ज्या भावना, जे विचार, जे तरंग कलाकाराच्या मनांत उद्भवतात ते सर्व त्याच्या प्रतिसृष्टींत प्रगट होत

असतात. प्रत्यक्ष वास्तव त्याच्या मनांत उतरून तेथील सारे रंग, आणि छटा, छाया आणि प्रकाश यांसह त्याच्या कलेत प्रगट होत असतें. अर्थात् त्याची प्रतिसृष्टि या पंचमहाभूतात्मक सृष्टीसारखी रूक्ष, नीरस नसून प्रत्यक्षांत जें मुळींच नाहीं ते त्याच्या कलेंत प्रगट होत असतें. कलाकार चाकूला चाकू व कात्रीला कात्रीच म्हणतो. पण चाकू कात्रींत जें कधींही नव्हतें व कधींही नसावयाचें तें तो सांगत असतो, म्हणूनच त्याची कृति अपूर्व आनंददायी वाटते. वेलीवर फुलणारें फूल आणि कलेंतील फूल यांत जमीन अस्मानाचें अंतर असतें. फुलाची कोमलता, त्याचे रंग, सुगंध, रस हे तर कलेच्या फुलांत असतातच. पण वेलीच्या फुलांत जी न्यूनता असते, जे काटे बोंचतात, जें कृमी कीटाचें भय असतें, तें कलेच्या फुलांत नसतें. इतकेंच नव्हे तर वेलीच्या फुलांत जे विचार, जे तरंग, ज्या भावना नसतात त्या कलाकाराच्या फुलांत असतात. वेलीवरचें फूल पार्थिव असतें तर कलेंतील फूल मानसिक चैतन्यानें थबथबलेलें असतें. फार काय सांगावें ? कलाकाराच्या हृदयांतील सर्वोच्च सर्वोत्कृष्ट कोषांत फुलाच्या संपूर्ण सौंदर्याची कल्पना तरंगत असते; तिला तो सूर, रंग, शब्द, दगड या साधनांनी मूर्त करीत असतो. येणेंप्रमाणें प्रत्यक्ष फुलावर तो अपूर्व भरारी मारीत असतो. नंतर तो तेंच फूल आपणाला देत असतो. म्हणून कलेचें फूल प्रत्यक्ष फुलापेक्षां आपणाला अधिक प्रिय वाटतें. त्याच्या अवलोकनानें उद्भवणाऱ्या सुखभावना प्रत्यक्ष फुलाच्या अवलोकनानें होणाऱ्या भावनासुखापेक्षां अगदींच भिन्न असतात. कारण,

प्रत्यक्ष वास्तव जग जड असतें तर कला मनोमय चैतन्यस्वरूप असते; प्रत्यक्ष जग न्यूनांनीं, दुःखांनीं व्याप्त असतें, तर कला पूर्णत्वाची द्योतक असते. प्रत्यक्ष जगांत छिन्नविच्छिन्न झालेली नीति, असत्यानें डागळलेलें सत्य व कुरूपतेनें विटाळलेलें सौंदर्य असतें. यांचे तुकडे व शकलें मात्र असतात तर कलेत संपूर्ण नीति, संपूर्ण सत्य, संपूर्ण सौंदर्य प्रगट होत असतें. प्रत्यक्ष जग दुःखमिश्रित असतें, तर कला 'ल्हादकमय' असते. म्हणून ती अलौकिक वाटते ही गोष्ट ध्यानांत धरून मम्मटानें रसाला ब्रह्मास्वादसहोदर, आणि अलौकिक आनंदाचें आगर म्हटलें आहे. सौंदर्यानंदाचें आणि पर्यायानें कलेचें विषयसुखाहून भिन्नत्व सांगतांना कँटनें तीन तत्त्वें सांगितलीं आहेत. तो म्हणतोः— सौंदर्यानंद (१) चिरस्थायी आणि पवित्र, (२) स्वार्थानपेक्ष किंवा निष्काम आणि (३) सर्वव्यापी असतो. मम्मटानें देखील जवळ जवळ असेच म्हटलें आहे. पण हा विषय इतका गहन आहे कीं, त्याचें सविस्तर विवेचन करूं लागल्यास अत्यंत विस्तार होईल म्हणून नाइलाज आहे. तथापि इतकें पुन्हां सांगणें अवश्य वाटतें कीं, ही सर्व कलाकाराची लीला, सहजोद्गार होय. दुसरा कोणताही हेतु येथें नाहीं.

आपण येथें उदाहरणादाखल ओलेतीचाच थोडासा विचार करूं. प्रत्यक्ष ओलेती सुंदरी पाहून ज्या भावना उद्भवतील त्याच भावना ओलेतीचें चित्र पाहून उद्भवणार नाहींत. कारण ओलेती सुंदरी पार्थिव हाडामासाची आहे तर ओलेतीचें चित्र मनोमय चैतन्यानें

ओथंबलेलें आहे. हाडामासाच्या ओलेतीला पाहून पापवासना उत्पन्न होण्याचा संभव आहे. पण ओलेतीचें चित्र पाहून, तें सर्वांगसुंदर असेल तर आपण " वाहवा! वाहवा!! काय बहार आहे!" असे उद्गार मात्र काढूं. पापवासनेचें स्थान पार्थिव शरीर, चित्रार्पित ओलेतींत हाडामासाचें शरीर कोठें आहे? तेव्हां पापवासना कशांत गुंतावी? हें चित्र पाहून 'अशी सुंदरी आपणास मिळावी' असा पापांकुर प्रेक्षकांच्या मनांत फुटेल असें कोणी म्हणेल; पण आधीं तर या वासनेस कृतींत प्रगट होण्याचें साधन नसल्यामुळें, पाप-चेष्टांस अवकाश नसल्यामुळें-ती प्रत्यक्ष ओलेती पाहून उद्‌भवणाऱ्या पापवासनेपेक्षां शतपट दुर्बल असावयाची; दुसरें—आणि मुख्यत्वें-करून असें कीं, ही गोष्ट कलाकाराच्या दृष्टीच्या पोंचेवर आणि त्यानें योजिलेल्या साधनावर अवलंबून राहील. त्याला जर आपल्या स्फूर्ति-बलानें पूर्ण सौंदर्य व्यक्त करितां आलें तर त्याच्या कौतुकांत आणि अलौकिक आनंदांत आपण इतके लीन होऊन जाऊं कीं, कोणत्याही अन्य भावनेस त्या सहजसमाधींत अवकाशच राहणार नाहीं क्षुधा, तृषा ह्या शारिरिक गरजांचें देखील आपणास भान राहणार नाहीं. फार तर काय त्या चित्रांत योजिलेल्या साधनांचा व्यतिरेकभाव देखील दृष्टिआड होईल. रंग आणि पत्र किंवा पट कोठून काय किंमतीला आणिले हा विचार तर एकीकडेच राहिला, स्वतः त्या साधनाकडे देखील आपलें लक्ष जाणार नाहीं. केवळ त्या संपूर्ण सौंदर्याशीं अलौकिक आनंदाशीं आपण अगदीं समरस होऊन जाऊं.

**शास्त्राणां विषयस्तावत् यावन्मंदरसा नराः ।**

**रसचक्रे प्रवृत्ते तु नैवं शास्त्रं नच क्रमः ॥**

मग पापवासनेची तर गोष्टच कशाला ?

**पापाची स्मृति राहिली जर नरा पाहूनि ही सुंदरी**
**धिक् धिक् त्या कळली अगाध हरिची नाहींच**
**कारागिरी.'**

असेंच म्हणावयाचें. म्हणूनच मम्मटानें रसाला ''विगलितवेद्यान्तरः' असें म्हटलें आहे.

येथें अशी शंका उद्भवते कीं, दुराचरणी पुरुष आपल्या प्रिय पात्राचे भलते सलते फोटो घेतात किंवा चित्रकारापुढें बसवून त्यांचीं निरनिराळीं चित्रें काढवितात त्यांचा परिणाम प्रेक्षकांच्या मनावर नीतिदृष्टीनें प्रतिकूल होणार नाहीं असें म्हणता येईल काय ? निःसंशय असे फोटो अगर चित्रें पापमूलच असावयाचीं आणि समाजदृष्ट्या तीं केव्हांही वाईटच म्हणावयाचीं. पण प्रश्न असा आहे कीं, अशा कृतीला ' ललितकला ' म्हणतां येईल काय ? वरील निरूपण ज्यांनीं काळजीपूर्वक वाचिलें असेल ते तिला कला असें कधींहि म्हणणार नाहींत. कारण, कलाकाराचा असल्या कृतीशीं कांहीच संबंध नसतो. कलाकाराच्या अंतरंगांतील भावना, कल्पना इत्यादि शक्तींचा ती अपत्य नव्हे. म्हणून ती मनोमय चित्स्वरूप अशी कृति नव्हे. फोटो तर केवळ यंत्रक्रियाच होय; जगांतील सर्वोत्तम कॅमेराला जें कधींही दिसणं शक्य नाहीं तें कलाकाराची दिव्य दृष्टी पाहात असते. माणसास समोर बसवून व्यावहारिक अर्थलोभानें काढिलेलें चित्र देखील यांत्रिकच म्हणावयाचें; कारण बहिर्मुख

डोळा देखील एक प्रकारचें यंत्रच होय. पहिलें ( कॅमेरा ) निर्जीव यंत्र म्हणावयाचें तर दुसरें सजीव इतकाच काय तो फरक. अर्थात् अशा रीतीनें काढिलेलें चित्र वास्तवरूपांची प्रतिकृति–नक्कल–मात्र होय. वास्तव जगाच्या आंत जें केवल सत्य ( सत्यम् ), जी केवल नीति ( शिवम् ), जो केवल आनंद ( सुंदरम् ) भरलेला आहे तेथ-पर्यंत कलाकाराची अंतर्दृष्टी पोंचत असते. तेव्हां त्याची कृति प्रत्यक्ष सृष्टीची प्रतिकृति नसून प्रतिसृष्टि असते. हाच कलेचा विशेष होय. प्रत्यक्ष वास्तव जग जसें आहे तसें सांगत असतां ती वास्तवावर अपूर्व भरारी मारीत असते. वास्तवांतील न्यूनें, वैगुण्यें जशींचीं तशीं हुबेहुब सांगत असतां तदंतर्गत संपूर्णता ती प्रगट करीत असल्यामुळें ती वास्तवांतील विषाचें अमृत करीत असते. प्रत्यक्ष वास्तव रूपांचें ठाईं जें नाहींच त्याची वार्ता ती सांगत असते. या ठिकाणीं सौंदर्य तत्त्वज्ञानांतील एक फार महत्त्वाचा प्रश्न उद्भवतो. वास्तववाद विरुद्ध कल्पनीयवाद (realism versus idealism) हा तो प्रश्न होय. हा मुद्दा इतका विशाल आणि गहन आहे कीं, त्याचें सांगोपांग विवरण करावयाचें म्हणजे एक स्वतंत्र ग्रंथच लिहा-वयास पाहिजे. तें येथें करूं लागल्यास मूल विषय एकीकडे राहून फार विषयांतर होईल. म्हणून तूर्त इतकेंच सांगणें पुरे. कला जरी वास्तव अशा रूपांवरून उद्भवली तरी ती वास्तवाची नक्कल नसते. नाहींतर आरशांत पडलेल्या प्रतिबिंबाला सर्वोत्तम कला म्हणण्याची पाळी येईल. कलाकाराच्या अंतरंगांत जें पूर्णत्व ( Subjective perfection ) वसत आहे त्याच्या दृष्टीनें तो वास्तवाकडे पाहात

असल्यामुळें वास्तवावर दृढ पदन्यास करीत असतां तो तदंतर्गत स्यसंवेद्य कल्पनागम्य पूर्णत्वापर्यंत भरारी मारीत असतो. घुमटाची कल्पना कदाचित् कांदा किंवा लसूण पाहून सुचली असेल; पण ताजमहालावरील घुमट कांदा किंवा लसुणाची नक्कल होय असे कोणी म्हणेल काय? सप्तसूर पशुपक्षांच्या शब्दांवरून घेतले असतील. पण एकाद्या रागांत जे सूर लागतात ते ज्या पशुपक्षांच्या शब्दांपासून घेतले त्यांच्या आरडाओरडीनें तो राग निर्माण होईल अशी अपेक्षा कोणी करितो काय? त्या रागांतील स्वरसंयोग, आरोह, अवरोह ही सारी कलाकाराची प्रतिसृष्टि नव्हे काय? त्याची प्रत्यक्ष वास्तवावर ही केवढी भरारी आणि केवढें उड्डाण! तो वास्तवाला सोडतो असें नाही; पण त्याला अश्रुतपूर्व अशी अलौकिक जोड मिळवून देत असतो. हेंच कलेचें परमोत्कृष्ट कार्य होय. शेक्सपियर म्हणतो—

This is an art
Which does mend nature, change it rather;
but
The art itself is nature.

म्हणजे कला निसर्गाची परिपूर्ति करिते—त्याचें परिवर्तन करिते; पण ती स्वत: निसर्गच होय. हा कलेचा धर्म नीट ध्यानीं आणिला म्हणजे फोटो इ० निसर्गाची नक्कल आणि खरी कला यांत किती अंतर आहे हें लक्षांत येईल. पहिली वास्तवाची केवल प्रतिकृति (Realistic imitation) होय तर दुसरी कल्पनीयजनित

प्रतिसृष्टि ( idealistic re-creation ) होय. दोघांची - बरोबरी कधींही होणार नाहीं. पहिली पापमूल आणि पापकारक असूं शकेल; पण दुसरी अलौकिक आनंदापासून उद्भवत असून पापक्षालन करणारी परम पवित्र होय. फार काय सांगावें ? जी कला वास्तवाच्या दुर्भेद्य व अजस्त्र भिंतीपर्यंत पोंचून तेथेंच थबकते व तदंतर्गत एक जिन्सी सत्वापर्यंत पोंचण्याचें जींत बल नसतें ती देखील हीन कलाच होय. तिजविषयीं प्रस्तुत लेखच नव्हे.

येथें अधिकाराचाही प्रश्न उद्भवेल. खरी कला हृदयांतील सर्वोत्कृष्ट कोषांतील पुण्यमय आनंदांत जनन पावत असते; त्याअर्थीं सर्वांवर आनंदाचा वर्षाव करून तद्वारां ती सामान्यतः आबाल वृद्धांचें उद्बोधन व उन्नयनच करीत असते. फार काय सांगावें, पशुपक्षांवर देखील ती परिणाम करिते अशी लोकांची समज आहे. पण एखाद्या हरीच्या लालास गायनासाठीं कानच लाभला नसेल किंवा तें ऐकून त्याच्या मनांत कुवासनाच उद्भवत असतील तर अशा " साक्षात्पशुः पुच्छविषाण हीनः " साठीं काय गायनकलेनें आपला व्यवहार टाकावा ? काय तिची मुस्कुटदाबी करावी ? एखाद्याला काव्याची रुचीच नसते व तो ' रंडागीतानि काव्यानि ' म्हणून ओरडतो. काय या " स वै मुक्तोऽथवा पशुः " साठीं काव्य कलेनें गप्प बसावें ? त्याला कवीबरोबर आरोहण करितां येत नाहीं यासाठीं काय कवीनें त्याकरितां आवरोहण करावें ? हिरा खाऊन कोणी जीव देईल यासाठीं हिऱ्याचा व्यवहार बंद झाला काय ? किंवा त्याची कदर कमी झाली काय ? ' तान् प्रति नैष यत्नः ' हेंच त्यांना उत्तर.

पण एकंदरींत अशीं माणसें ब्रह्मदेवाच्या प्रमादाचे मासलेच म्हणावयाचे. कलेचा विचार करितांना अशा मूठभर माणसांकडे दुर्लक्ष करणेंच उचित होय. मानवी पुरुष आणि विशेषतः स्त्री ही ब्रह्मदेवाच्या करामतीची पराकाष्ठा होय. पण त्यांचें अर्ध्याहून अधिक सौंदर्य वस्त्रांनीं झांकलेलें असतें. तें अनावृत्त करून ग्रीक कलेनें नग्न स्त्रीपुरुषांच्या मूर्तिद्वारां आजपर्यंत शेंकडों वर्षे लक्षावधि माणसांना

Heard melodies are sweet

But those unheard are sweeter!

या कीटस्‌च्या उक्तीचा प्रत्यय आणून दिला आहे. ही कलाकृति जर नीतिभ्रष्टतेला कारण झाली असती तर या दीर्घ कालांत तिचा निभाव लागला नसता. माणसानें तोडून मोडून तिला उकिरड्याची वाट दाखविली असती. असो.

६. वर असें म्हटलें आहे कीं, कलेंत संपूर्णता प्रकट होत असते; ती ' ल्हादेकमय ' असते; तेथें दुःखाला जागा नसते. येथें असा प्रश्न उद्भवण्याचा संभव आहे कीं, कलेंत जर प्रत्यक्षांतील विषमता नसते तर यागो व शकार, तुफान व सांथीचे रोग, सर्प आणि विंचू, हे कोठून आले ? या प्रश्नाचें उत्तर वर आलेंच आहे. तें असें कीं, कलाकार चाकूस चाकू आणि कात्रीस कात्रीच म्हणतो तरी देखील त्यावर भरारी मारतो. ओलेतीच्या चित्रांत हाडमास नाहीं, तरी देखील हाडामासाला चित्रकारानें वगळलें आहे असें नाहीं. भातुकलीच्या खेळांत मुली आपल्या बाहुलाबाहुलीस दुःखाचा विटाळ न होऊं देण्याची खबरदारी घेतात, पण त्यांत देखील मोल-

करणी, हुजरे, भिस्ती इ. कमी दर्जाचीं पात्रें असतातच, आणि त्यांच्या लुटूपुटीच्या कार्यांतील विहिणीचे रुसवे फुगवे असतातच! असें असून देखील त्याचा खेळ ‘ल्हादेकमय’ असतोच. ‘ल्हादेकमयता’ म्हणजेच संपूर्ण सत्य, व संपूर्ण नीति. या कोडयाचा आपण उलगडा करण्याचा प्रयत्न करूं. सूर्य, चंद्र, नक्षत्रें, डोंगर, नद्या, सरोवरें; साधुसंत, महात्मे; चोर, डाकू, भामटे इ. परस्पर विपरीत रूपें आपण परमात्म्याच्या सृष्टींत पाहतों. पण हीं रूपें तदंतर्गत जीवावाचून आणि सत्वावाचून संभवतील काय? तीं केवळ प्रतीकें मात्र होत, ज्याला सौंदर्य तत्त्वज्ञानांत Symbols असें म्हटलें आहे. बाळकृष्णाची दगडाची प्रतिमा त्याच्या भक्ताला निःसंदेह असें सांगत असते कीं, माझ्या ठायीं परमेश्वर आहे. त्याप्रमाणेंच हीं सारीं प्रतीकें मोठमोठ्यानें पुकार करीत असतात कीं, आमचे ठायीं सत्व आहे. तुम्ही आमच्या बाह्य भिन्न रूपांना पाहून भुलून जाऊं नका. आमची ही विषमता वरपांगी आहे. आमच्या आंत जें आमचें अधिष्ठान तें एकजिनसी आहे. तेथें विषमता नाहीं. आम्ही अपूर्ण दिसत असलों तरी तें पूर्ण आहे. असो. तात्पर्य काय कीं, जगाच्या भिन्नतेच्या बुडाशीं ऐक्य आहे; विषमतेच्या ठायीं समता आहे; अपूर्णतेच्या ठायीं पूर्णता आहे. सांतत्वाच्या मुळाशीं अनंतत्व आहे. कोणीही असें म्हणूं शकेल काय कीं, साधुसंत महात्म्याला घडणारा विधाता एक होता आणि कुटिल दुर्जनांना घडणारा दुसरा होता? आतां ललितकला संसारांत गुंतली असतां संसारावर भरारी मारते याचा अर्थ काय? याचा विचार करूं. संसाराच्या बुडापर्यंत ती पोंचते.

संसारांतील सदाचारी, दुराचारी यांस स्थळ देत असतां यांच्या ठायीं असलेलें जें एकजिनसी सत्व याचा थांग लावते. नव्हे, त्याचा थांग लावणें हीच कलेची इतिकर्तव्यता होय–जीवन होय–आत्मा होय. म्हणूनच 'वाक्यं रसात्मकं काव्यम्' या रसालाच 'अलौकिक' म्हणजे इहलोकचा नव्हे तो, असें म्हटलें आहे. ललितकलेंत येणें-प्रमाणें विषाचें अमृत होतें. विषमतेला स्थान असून समताच मुख्यत्वें करून ध्वनित होत असते. म्हणूनच संपूर्ण सत्य, संपूर्ण नीति, संपूर्ण सौंदर्य याचें ती परम मंगल धाम होय. Beauty is Truth, Truth Beauty यांत थोडा फेरफार करून मी असें म्हणतों Beauty is Truth and Goodness and Truth and Goodness Beauty. सत्य, सौंदर्य आणि नीति हे एकजीव झाले आहेत–नव्हे एकच आहेत. द्वंद्वमूल समता विषमता, दुराचार सदाचार यांनीं परिवेष्टित संसाराच्या अनेक नामरूपांत ही त्रयी प्रगट झाली आहे. म्हणून संसारांत देखील विषमता वरवरची आहे. मूळाशीं समत्वच आहे, आनंदच आहे. "आनंदादेव खल्विमानि भूतानि जायन्ते" हेंच खरें होय. पण या संसाराच्या अजस्र दडपणाखालीं चेंगरून गेल्यामुळें आपली दिशाभूल होऊन त्यांतील हें ऐक्य आपणास दिसूं शकत नाहीं. कलाकार याच संसारांत तें कसें ओत-प्रोत भरलें आहे, कलेवरांत प्राण असावा त्याप्रमाणें तें कसें सर्व-रूपांचें ठायीं व्यापून राहिलें आहे हें आपणास ध्वनित करीत असतो 'जें न देखे रवि' तें जगद्रहस्य ( mystery ) तो ध्वनित करीत असतो असें वर सांगितलें आहे; त्याचा अर्थ हाच. त्या

मंगल स्वरूपामध्यें अमंगलपणा कोठून येईल ? तेथें अनीतीला वाव कशाची ? जगांतील नीतीचें छिन्नविच्छिन्न स्वरूप एक संपूर्ण नीतींतून कसें निघालें आहे, हें कलाकार सुचवित असतो. म्हणूनच कला नीतीचें मंगलधाम होय. कोठारच हातीं लागल्यावर त्यांतील जिनगा वेगळ्या भिन्नभिन्न कशाला हव्या ?

पण येथें प्रश्न असा उद्भवतो कीं, या प्रतीकमय बाह्य विश्वाचीं कपाटें उघडून त्यांतील सत्त्वापर्यंत कलाकार कसा पोंचतो ? कोणती अशी किल्ली त्याच्याजवळ आहे कीं, जीमुळें हीं जखडून लागलेलीं कपाटें त्याला भराभर उघडतां येतात ? प्रश्न अंमळसा गहनच आहे. पण त्याचें सविस्तर विवेचन करण्याचें हें स्थान नव्हे. तसें करूं लागल्यास मूळ विषय एकीकडे राहून या एका प्रश्नाचाच विस्तार फार होईल. पण मुळींच हा प्रश्न सोडून दिला तर विषयविवेचनांतील एक दुवा सुटल्यासारखें होईल. म्हणून त्याचें केवळ दिग्दर्शन येथें करून आपण पुढें चालूं. बाह्य जगांतील न्यूनें ज्या ठिकाणीं नाहींत असें संपूर्णत्व त्याचें स्वतःचेंच ठायीं आहे. यासंबंधीं टेनिसन्च्या पुढील ओळी ध्यानीं धरण्यासारख्या आहेत.

The type of the Perf ct in the mind
In nature nowhere we can find.

तेव्हां सृष्ट वस्तूंच्या केवळ नामरूपांत जीं न्यूनें आणि वैगुण्यें दिसतात तीं त्याच्या स्वतःच्या अंतरंगांत नाहींशीं होत असल्यामुळें त्या पूर्णतेच्या दृष्टीनें जेव्हां तो वस्तूकडे पाहूं लागतो, तेव्हां हें वास्तव जग जसें असावें तसें नाहीं अशी त्यास प्रचीति येऊन तो

तदंतर्गत सत्त्वाकडे धांव घेऊं लागतो – त्याचें स्वस्वरूप विश्वांत पसरलेलें तो पाहूं लागतो. टेनसनच्या उक्तीप्रमाणें 'I see myself in all I see' असा अनुभव त्याला येतो. बाह्य विश्व त्याच्या अंतरंगातील पूर्णतेचें प्रतिबिंब आहे असें त्याच्या अनुभवास येऊन त्याच्या स्वतःच्या अंतरंगातलें अपरिमित सौंदर्य या विश्वाच्या अंतरंगांत भरलें आहे ही जाणीव त्याला न कळत (subconscious) होऊं लागते तेव्हां विश्वांतील संपूर्ण सौंदर्याची खरी किल्ली स्वतः त्याच्याजवळ असते. तत्त्वज्ञानी याच किल्लीचा उपयोग तर्कबलानें, विवेकानें करीत असतो. कलाकार भावबलानें करीत असतो हाच काय तो फरक. तात्पर्य, काय कीं कलाकार केवळ भावबलानें न कळत संपूर्णता व्यक्त करीत असतो. तेथें त्याचा आत्माच साक्षी असतो 'आत्मानस्तुकामाय सर्वं प्रियं भवात' असें जें उपनिषदात सांगितलें आहे तेंच खरें. आत्मा हा स्वतः आनंदरूप असल्यामुळें तो स्वतःलाच सर्व विश्वांत पाहूं लागला म्हणजे सारें जग त्याला आनंदात न्हालेलें दिसूं लागतें. कलाकार बाह्य जगाशीं आत्मदर्शनें समरस झाला म्हणजे त्याचे ठायीं तद्विषयक सौहार्द व आत्मीयता उत्पन्न होते. त्यानें सारें जग त्याला प्रिय वाटूं लागतें. ही प्रियतेची, आनंदाची भावना त्याच्या सर्व कृतींत बिंबते. या भावनेच्या रंग, छटा, छाया प्रकाशानें त्याची कृति रंगलेली असते. म्हणून ती रम्य वाटते – पूर्णत्वाची सूचक असते. रसिकाला देखील रसास्वाद कसा होतो याची व्युत्पत्ति अभिनवगुप्तानें अशाच प्रकारची सांगितली आहे. प्रोफेसर नाईटनें

आपल्या Philosophy of the Beautiful या ग्रंथांत अगदीं असाच अनुवाद केला आहे. त्याचें सारें म्हणणें त्याच्याच शब्दांत येथें देणें विस्तारभयामुळें अशक्य आहे.

वरील निरूपणाचा असा अर्थ नाहीं कीं, कलाकार वास्तव विश्वाविषयीं बेपर्वा असतो किंवा केशवसुत कधीं कधीं म्हणतात त्याप्रमाणें जगाला कंटाळलेला, 'विमनस्क' असतो किंवा त्याला 'धिकार या जगीं इच्छित न मिळे कांहीं' असा शिव्याशाप देतो. छे! खरी गोष्ट याच्या अगदीं उलट आहे. जगताच्या बुडाशीं असलेलें एकजिनसी संपूर्ण सौंदर्य आकलण्याचा प्रत्यक्ष जग हा एकच मार्ग होय. प्रत्यक्ष रंग, रूप, रुचि, वास, गति, परिवर्तन यांमुळेंच सौंदर्य प्रगट होऊं शकतें. याविण कलाकाराला संपूर्ण एकजिनसी सौंदर्याची कल्पनाच होणें शक्य नाहीं. प्रत्यक्षांत तें इंद्रियगोचर होतें म्हणूनच त्याची जाणीव होऊं शकते. एरवीं जेथें असत्य, अनीति नाहींच तेथें सत्य किंवा नीतीची कल्पनाच संभवत नाहीं. आपलें सारें ज्ञान द्वंद्वमूल आणि सापेक्ष असतें. उजेडाची कल्पना अंधारावांचून होणेंच शक्य नाहीं. तीच गोष्ट सत्याची, नीतीची किंवा सौंदर्याची. जेथें केवळ एकजिनसी संपूर्णता मात्र आहे अशा ठिकाणीं कला संभवणारच नाहीं. कल्पनामय अदृश्य जग मूर्त आणि दृश्य अशा प्रत्यक्ष जगाच्या पूर्तीचें हें खरें; पण तें मूर्त झालेंच नाहीं तर कसें कळावें? तेव्हां द्वंद्वमूल अपूर्णताच पूर्णतेपर्यंत पोंचण्याची सोपानपंक्ति होय. आणि कलाकार खरोखर प्रत्यक्ष जगाशींच लीन होत असतो. कल्पनामय पूर्ण जग आणि मूर्त प्रत्यक्ष

जग हीं दोन परस्पर भिन्न अशीं अस्तित्वें नाहींत. त्यांचा कारण व कार्य असा संबंध आहे. दोन्ही एकच. विवृत कारण म्हणजे कार्य आणि संवृत कार्य म्हणजे कारण. त्यांचीं दोन वेग वेगळालीं क्षेत्रें नाहींत. दोन्हींचा आत्मा आणि शरीर असा संबंध आहे. कला दोवांचेंही ग्रहण करिते, अंतर्बाह्य जगाशीं लीन होते. केवळ अंतरंगाचीच हाव धरणारी कला शेक्सपियरच्या एरियलसारखी होय. ती कधीं दिसणारच नाहीं, आणि कला या संज्ञेस पात्रही नाहीं. केवळ बहिरंगापलीकडे जाण्याची जीस शक्ति नाहीं ती त्याच्याच (शेक्सपियरच्याच) कॅलिबन सारखी होय. ती स्वतःच्याच कुरूपतेनें लज्जित होऊन प्रत्यक्ष जगाला शिव्या देईल. तीही कला या संज्ञेस अपात्र होय. खरी कला प्रत्यक्ष वास्तव जगाला धरून तदंतर्गत संपूर्णतेपर्यंत पोंचते. म्हणजे चाकूला चाकू, कात्रीला कात्रीच म्हणत असतां त्यांवर भरारी मारिते.

९ येथपर्यंत कला ही संपूर्ण नीतीचें परमधाम कशी यांचा विचार झाला. आतां अन्य दृष्टीनें कला नीतीचें कार्य कशी करीत असतें तें पाहूं. आपल्या ठायीं सदाचाराचें स्थान कोणतें ? आपली स्मरणशक्ति कीं आपलें हृदय ? हृदयाचें उद्बोधन झाल्यावांचून केवळ स्मरणशक्तीच्या बळावर माणसें नीतिमान् होतील काय ? अशी कल्पना करा कीं, आपल्या स्मृतीचें कोठार नीतिपाठांनीं आणि विधिनिषेधात्मक वचनांनीं खचून भरून ठेविलें आहे. अमुक करावें, तमुक करूं नये इत्यादि विधिनिषेधसूचक ‘मातृदेवो भव’, ‘पितृदेवो भव’, आचार्यदेवो भव’, ‘स्वाध्यायान्मा प्रमदितव्यम्’ इत्यादि

वचनें खूप कोंबून कोंबून या स्मृतीच्या भांडारांत भरून ठेविलीं आहेत, तरी तीं मनुष्याच्या चारित्र्याला उपयोगी पडतील असें आपल्याला म्हणतां येईल काय? मला वाटतें एखादें व्याख्यान देण्याच्या वेळीं एकादा कुशल वक्ता त्यांना उद्धृत करून टाळ्यांचा कडकडाट प्राप्त करून घेईल, किंवा एकादा शास्त्रीपंडित वादविवादाच्या सभेत त्यांच्या बलावर विजयपत्रिका पटकावील. पण त्यांचें हृदय सुसंस्कृत झाल्याशिवाय ही उपस्थिति चारित्र्य निर्माण करण्यास फारशी उपयोगी पडणार नाहीं. त्याच्या भावना उज्वल झाल्या पाहिजेत; विवेक शुद्ध झाला पाहिजे; सहृदयता, समरसता, कल्पना या शक्तींना वळण मिळालें पाहिजे. खरें नीतिशिक्षण हेंच होय. हें कार्य कशानें घडून येईल? 'व्यर्थ भाराभर। केलें पाठांतर। जोंवरि अंतर। शुद्ध नाहीं॥' अंतःकरणाला वळण मिळालें पाहिजे. 'मातृदेवो भव' असें घोकल्यानें कोणी मनुष्य मातृभक्त होत नसतो, तर त्याचें हृदयच असें कांहीं वळाविलें गेलें पाहिजे कीं, आपल्या आईविषयीं त्याच्या ठायीं भक्ति, कळवळा, इत्यादि भावना प्रगट व्हाव्यात. अर्थात् भावनोद्दीपन हें खरें नीतिशिक्षण होय.

आतां हें कार्य कला कसें घडवून आणते याचें आपण एक प्रत्यक्ष उदाहरण घेऊं. अशी कल्पना करा कीं, एकादें नाटक पहाण्यास—आपण अथेल्लोच घेऊं या—आपण नाटकगृहास गेलों आहों, आणि तेथें प्रयोग पहात आहों. यागोचें पात्र आपल्या डोळ्यांसमोर आलें म्हणजे त्याची कृष्णकारस्थानें, त्याचें कारव्य, दुष्टावा पाहून आपला तिळपापड होऊन जातो. अथेल्लोला पाहिलें म्हणजे त्याचा

नेभळेपणा, भोळसटपणा पाहून आपल्यास त्याची कींव वाटूं लागतें; डेस्डिमोनाचा प्रवेश होतांच आपलें अंतःकरण आदरानें भरून येतें. तिची निष्कलंक, निर्व्याज प्रीति, तिचा स्वार्थत्याग, अकृत्रिम व्यवहार, तिचें मांगल्य, तिचें सौंदर्य या गोष्टी पाहून आपलें हृदय भरून येतें; आणि जेव्हां तिचा प्रत्यक्ष पति तिच्या निजण्याच्या खोलींत प्रवेश करून तिच्या वधास उद्युक्त होतो, तेव्हां तर 'हें काय अमानुष कृत्य आपण बघत आहों, खरोखरच हा हिचा घात करणार कीं काय' असें मनांत येऊन आपलें हृदय धडधडायला लागतें; आपले अश्रु वाहूं लागतात; अंग रोमांचित होतें; आपल्या मनांत तुफान उभें राहतें; आणि कोणी आपल्या जीवनाचा पाया गदगदा हालवित आहे कीं काय असें होऊन आपली वृत्ति अगदीं स्तंभित होते. या परिवर्तनशील जगद्रंगभूमीवरील क्षणोक्षणीं होणारी उलटापालट आणि घडामोड पाहून, लक्ष्मीची चंचलता पाहून, दैवाचा दुर्विलास पाहून आपली वृत्ति गोंधळून जाते. तरी पण नाटक संपेपावेतों आपण आपल्या जागेला खिळून जातों, जणूं काय एकाद्या मांत्रिकानें आपले हातपाय जखडून टाकले असावेत; आणि शेवटपर्यंत आपली आतुरता क्षणोक्षणीं वाढत जाते, हृदय भारी होतें, आणि घरीं जाऊन विसाव्यासाठीं पलंगावर पडावें, दिवे मालवावे आणि झोंपेची इच्छा करावी तों चमत्कार काय! झोंप शिवेनाशी होते; तेंच तें नाटक पुन्हां डोळ्यांसमोर दिसूं लागतें; पुन्हां तेंच काहूर द्विगुणित बलानें माजूं लागतें. जगांत प्रीति प्रीति म्हणतात, नीति नीति ओरडतात, सत्य सत्य म्हणून

पुकार करितात, तर अशा कांहीं वस्तु या जगांत असतील काय ? सदाचार म्हणून ज्या गोष्टी सांगतात तीं केवळ स्वप्नेंच काय ? नाहींतर डेस्डिमोनासारख्या परममंगल, परमशुद्ध, परमपवित्र सतीचा असा अंत कां व्हावा ? या जगाचा नियंता दयाळू देव आहे, कीं कोणी निर्दयी राक्षस आहे, असे शेकडो प्रश्न मनांत उभे राहून धरणेकऱ्यासारखे डोळे वटारून उत्तरें मागूं लागतात. आपली विवेकशक्ती जागृत होते; कल्पना भराऱ्या मारूं लागते; सहृदयता उचंबळून येते; भावनांची खळबळ माजते; आपल्या मानवी ज्ञानाचें क्षेत्र विस्तीर्ण अफाट होतें आणि या सर्व प्रकारांत कोठेंही आपला स्वार्थ गुंतला नसल्यामुळें, आपली निःस्वार्थता जागी होते. येणें-प्रमाणें ज्या ज्या शक्ति चारित्र्याला निर्माण करितात त्या सर्वांना एकसमयावच्छेदेंकरून चलन देऊन कलाकार त्यांचा हलकल्लोळ करून देतो. इतकेंच नव्हे तर जणूं काय आपलें बोट धरून आपल्या हृदयांत जें संपूर्णतेचें अमृतसरोवर तुडुंबलें आहे कीं, जेथें तिन्ही काळ जणूं काय सुईच्या अग्रावर एकवटतात, जेथें अमं-गलता, असत्य, किंवा कुरूपता यांस थारा नाहीं; जेथें बहिर्जगांतील बेसुर विषमतेच्या किंकाळ्या आणि आरोळ्या एक मधुर स्वरसम्मे-लनांत विरून जातात, जेथें एक ' ल्हादैकमयता ' मात्र नंदादीपा-प्रमाणें तेवत असते, तेथपर्यंत आपणांस पोंचवून, बुडी देववून सुस्नात आणि पुनर्जात असा तो आपल्याला बाहेर काढितो हें खरें नीतिशिक्षण होय. कारण नीतीचे जे घटकावयव आपले ठायीं आहेत त्या सर्वांचीच लीला त्यांस जोराचा धक्का देऊन तो सुरू

करून देतो. येणेंप्रमाणें कलाकार मूठभर अवकाशांत जें नीतीचें कार्य घडवून आणतो तें नीतिपाठाचे धडे घालणाऱ्या शास्त्रीपंडिताच्या पिढ्याच्या पिढ्यांना करितां येण्यासारखें नाहीं.

१० येणेंप्रमाणें कला, नीतीची पर्वा न करितांही, संपूर्ण नीतीचें परम मंगलधाम होय.

---